राज्य सेवा हक्क आयुक्त, नाशिक/पुणे/नागपूर/ अमरावती/औरंगाबाद महसूली विभाग या नव्याने सुरु झालेल्या कार्यालयांसाठी संबंधित विभागीय आयुक्त (महसूल) कार्यालयातील "उपायुक्त (सामान्य प्रशासन)" यांना तात्पुरत्या स्वरुपात "समन्वयक अधिकारी" म्हणून <u>नियुक्त करणेबाबत.....</u>

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक. आरटीएस-२०२१/प्र.क्र.२९६/लो.दि.कक्ष
मंत्रालय, विस्तार इमारत, ६ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २१ जानेवारी, २०२२.

<u>वाचा</u> :- १) महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५
२) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.आरटीएस-२०१६/प्र.क्र.१२४ (१)/१८ (र. व का.), दि.३० जुलै, २०१६
३) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.आरटीएस-२०२१/प्र.क्र.१५८/लो.दि.कक्ष, दि.२३ नोव्हेंबर, २०२१.
२) राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयाचे अ.शा.पत्र क्र.विआका-२०२१/प्र.क्र.७१/मुसेहआ, दि.३० नोव्हेंबर, २०२१.

<u>प्रस्तावना :-</u>

महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५ च्या कलम १३ मधील तरतूदीनुसार संदर्भाधिन दि.३० जुलै, २०१६ रोजीच्या अधिसूचनेन्वये "महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग" घटित करण्यात आलेला आहे. सदर आयोगामध्ये एक मुख्य सेवा हक्क आयुक्त व सहा महसूली विभागांसाठी (कोकण/ नाशिक/ पुणे/ नागपूर/ अमरावती/औरंगाबाद) करिता प्रत्येकी एक राज्य सेवा हक्क आयुक्त यांचा समावेश आहे. त्यानुसार राज्य सेवा हक्क आयुक्त,नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद या पदावर संदर्भाधिन शासन अधिसूचना दि.२३ नोव्हेंबर, २०२१ अन्वये नेमणुका करण्यात आल्या असून संबंधित आयुक्तांनी दि.०१/१२/२०२१ रोजी पासून त्यांचा पदभार स्विकारला आहे. सदर कार्यालये नियमितरित्या कार्यान्वित होईपर्यंतच्या कालावधीमध्ये, संबधित कार्यालय उभारणीच्या कामकाजात सहकार्य होण्यासाठी प्राथमिक व्यवस्था करण्याकरिता विभागीय आयुक्त (महसूली विभाग) यांच्या कार्यालयातील उपायुक्त दर्जाचा एक अधिकारी समन्वयक अधिकारी म्हणून नेमण्याबाबतची विनंती संदर्भाधिन दि.३० नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या पत्रान्वये करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय** :-

राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद या ५ कार्यालयांसाठी संबंधित विभागीय आयुक्त (महसूली विभाग) कार्यालयातील "उपायुक्त (सामान्य प्रशासन)" या पदावर कार्यरत अधिकारी यांना तात्पुरत्या स्वरुपात पुढील आदेश होईपर्यंत "समन्वयक अधिकारी" म्हणून नियुक्त

करण्यास व त्यांना राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद या कार्यालयांशी संबंधित कामकाज सोपविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**२.** राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद या कार्यालयांसाठी नियुक्त केलेल्या विभागीय आयुक्त (महसूली विभाग) कार्यालयातील "उपायुक्त (सामान्य प्रशासन)" या पदावर कार्यरत अधिकारी यांनी राज्य सेवा हक्क आयोगाशी संबंधित "समन्वयक अधिकारी" म्हणून खालीलप्रमाणे कामकाज करावे :-

१. राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद कार्यालयासाठी सबंधित महसूली विभागात जागेचा शोध घेऊन याबाबतचा प्रस्ताव राज्य सेवा मुख्य हक्क आयुक्तांमार्फत शासनास सादर करणे.

२. राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद कार्यालयासाठी सबंधित महसूली विभागातून प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी अधिकारी/कर्मचारी यांची इच्छुकता मागवून त्यांचे विहीत नमुन्यातील अर्ज आवश्यक त्या कागदपत्रांसह संबंधित राज्य सेवा हक्क आयुक्त यांच्या मान्यतेने शासनास करणे.

३. राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद यांच्यासाठी कायमस्वरुपी कार्यालय उपलब्ध होईपर्यंत सदर कार्यालयाची तात्पुरती व्यवस्था संबंधित महसूली विभागातील शासकीय इमारतीतील उपलब्ध असलेल्या कार्यालयात करणे.

४. तसेच राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त आणि संबंधित महसूली विभागातील राज्य सेवा हक्क आयुक्त यांच्यामार्फत राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/ औरंगाबाद येथील कार्यालयांशी सबंधित सोपविण्यात येणाऱ्या सर्व कार्यालयीन जबाबदाऱ्या प्रचलित शासन नियमानुसार पार पाडणे.

**३.** सदर शासन निर्णय, महसूल व वन विभागाने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक F १३०२/२०२१/ ई-१, दि.१३/०१/२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२२०२१६१६०३१९६१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JANA JIVA VALVI

Digitally signed by JANA JIVA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=816d3fe4c7042f66b4ac73a1f0087cd8fda3e115d42dc8b54c0e783064c80dc1, pseudonym=BC7303629AB7AFCA8CE15C55D2BEFE77F3006E6E, serialNumber=FD6F9785FE220B2C0F30D422D401E2DFC838A0D9EC621401534F5B36EAF57F26, cn=JANA JIVA VALVI
Date: 2022.02.16 16:06:42 +05'30'

**( ज.जि.वळवी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.राज्यमंत्री (सामान्य प्रशासन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. राज्य सेवा हक्क आयुक्त, नाशिक/नागपूर/पुणे/अमरावती/औरंगाबाद ( राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयामार्फत)
५. सर्व विभागीय आयुक्त (महसूल), महाराष्ट्र राज्य.

६. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
७. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
९. सह सचिव, मुख्य सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
१०. सह सचिव, महसूल व वन विभाग, कार्यासन ई-१, मंत्रालय, मुंबई-३२.
११. उप सचिव, राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
१२. उप सचिव / अवर सचिव, कार्यासन-२६, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४. कक्ष अधिकारी, कार्यासन व्यय-४/कोषा-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती (लो.दि.कक्ष)